2004081217354 2001-1700

खाजगी जमिनीवरील झोपडपट्ट्या घोषित करणे.

महाराष्ट्र शासन
गृहनिर्माण विभाग
शासन निर्णय क्रमांक : गवसु १०११/प्र.क्र.१६६/झोपसु-१
मंत्रालय, मुंबई- ४०० ०३२
दिनांक :- २८ मे, २००१.

प्रास्ताविक

महाराष्ट्र झोपडपट्टी अधिनियम, १९७१ चे कलम ४ नुसार झोपडपट्टी घोषित करण्यात येतात. शासनाने झोपडपट्टी घोषित करणेबाबत वेळोवेळी निदेश दिलेले आहेत. तथापि, नेमक्या किती झोपडया असतील तर ते क्षेत्र घोषित करण्यात यावे याबाबत धोरणात्मक निर्णय घेऊन शासन निर्णय निर्गमित करण्यात आलेला नाही.

झोपडपट्ट्या घोषित करण्याचे धोरण, अफझुलपुरकर समितीने झोपडपट्टी पुनर्वसन योजनेसाठी केलेला क्लस्टर ॲप्रोच विचारत घेऊन करण्यात आलेल्या शिफारशी व अधिनियमातील कलम ४ मध्ये नमूद करण्यात आलेल्या अटी या सर्वांचा विचार करता गलिच्छवस्ती घोषित करण्यासाठी धोरणात्मक निर्णय घेण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती. त्यावर आता शासनाने खालीलप्रमाणे निर्णय घेतला आहे.

शासन निर्णय:

झोपडपट्टी अधिनियम १९७१ चे कलम ४ अन्वये खाजगी जमिनीवरील पात्र झोपडपट्ट्या घोषित करतांना ज्या छोटया झोपडपट्टयांमध्ये कमीत कमी २५ झोपडया आहेत आणि त्या झोपडपट्टयांखालील क्षेत्र २५० चौ.मि. पेक्षा जास्त नाही अशाच झोपडपट्ट्या घोषित करण्यास पात्र राहतील. म्हणजेच छोटया झोपडपट्टया घोषित करतांना २५ झोपडया व क्षेत्र २५० चौ.मि. हे निकष धरण्यात यावेत.

खाजगी जमिनीवरील २५० चौ.मि. क्षेत्रापेक्षा जास्त क्षेत्र असलेल्या आणि किमान २५ अथवा त्यापेक्षा जास्त झोपडया असलेल्या झोपडपट्ट्या शासनाच्या मान्यतेने घोषित करण्यात याव्यात.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नांवाने.

9/5/2009

(ल.दा. व्यास)
उप सचिव, महाराष्ट्र शासन